**सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिनस्त असलेल्या दर्शनिका विभाग, मुंबई या क्षेत्रिय कार्यालयाच्या गट-क मधील शासकीय कर्मचाऱ्यांना गट-ब मध्ये पदोन्नती देण्यासाठी "विभागीय पदोन्नती समिती" ची स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: दर्शनि-२०२२/प्र.क.९०/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १६ मे, २०२३

वाचा : १. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्यासन १२, दि.०१ ऑगस्ट,२०१९
२. शासन आदेश पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक: दर्शनि-२०२२/ प्र.क.९०/ सां.का.२ दि.३ जानेवारी,२०२२

**शासन निर्णय:**

संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये पर्यटन व सांस्कृतिक कार्य या प्रशासकीय विभागाच्या अधिनस्त असलेल्या दर्शनिका विभाग, मुंबई या क्षेत्रिय कार्यालयातील गट- क च्या पदावरून गट-ब च्या पदावर पदोन्नती देण्यासाठी "विभागीय पदोन्नती समिती" स्थापन करण्यात आली होती. मात्र, सदर शासन निर्गमित करतांना संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांना पदोन्नती देण्याकरिता अनुसरावयाच्या कार्यवाहीबाबत विहीत करण्यात आलेल्या एकत्रित मार्गदर्शक तत्वांचा अवलंब झालेला नाही.त्यामुळे संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये दर्शनिका विभागातील गट- क च्या पदावरून गट-ब च्या पदावर पदोन्नती देण्यासाठी गठीत करण्यात आलेली " विभागीय पदोन्नती समिती" बरखास्त करण्यात येत करण्यात येत आहे.

२. आता, सदर शासन निर्णयान्वये सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिनस्त असलेल्या दर्शनिका विभाग,मुंबई या क्षेत्रिय कार्यालयातील कर्मचारी यांना गट-क मधून गट-ब मध्ये पदोन्नती देण्यासाठी पुढीलप्रमाणे **"विभागीय पदोन्नती समिती"** स्थापन करण्यात येत आहे.

**दर्शनिका विभाग, मुंबई:-**

**गट-क च्या पदावरून गट ब च्या पदावर पदोन्नती देण्यासाठी " विभागीय पदोन्नती समिती"**

| | |
|---|---|
| १. कार्यकारी संपादक तथा सचिव, दर्शनिका विभाग | अध्यक्ष |
| २.सह संपादक, दर्शनिका विभाग | सदस्य |
| ३.उपसंपादक, दर्शनिका विभाग | सदस्य |
| ४. संशोधन अधिकारी, दर्शनिका विभाग | सदस्य सचिव |

उपरोक्तप्रमाणे गठीत केलेल्या विभागीय पदोन्नती समितीने संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयात नमूद केलेल्या बाबी विचारात घेऊन गट-क मधून गट-ब मध्ये पदोन्नती बाबतचा परिपूर्ण प्रस्ताव शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०५१६१६३३३४३५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.05.16 16:34:08 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य),मंत्रालय, मुंबई.
७) उप सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय, मुंबई.
८) कार्यकारी संपादक व सचिव,दर्शनिका विभाग,मुंबई.
९) निवड नस्ती, सां.का.२.